पारेषण विरहीत सौर कृषी पंप व पारंपारिक कृषीपंप वीज जोडण्या वितरित करण्याबाबत तसेच कृषी वाहिनीचे सौर उर्जीकरणासाठी संलग्न योजना राबविण्यासाठी व AIIB बँकेकडून कर्ज घेण्यास मंजुरी देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग

## शासन निर्णय क्रमांक:-सौरप्र-२०२०/प्र.क्र.२५९/ऊर्जा-७

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक:- १५ मार्च, २०२४.

वाचा :-

१) उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र.अपाऊ-२०२०/प्र.क्र.१३७/ऊर्जा-७, दि.३१.१२.२०२०
२) उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र.सौरप्र-२०१९/प्र.क्र.२६८/ऊर्जा-७, दि.१२.०५.२०२१.
३) उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र.सौरप्र-२०२३/प्र.क्र.९५/ऊर्जा-७, दि.०८.०५.२०२३.
४) महावितरण कंपनी यांचा प्रस्ताव क्र. सीएमडी/एमएसईडीसीएल/१९४३२, दि.२८.०६.२०२३.

प्रस्तावना:-

महाराष्ट्र राज्य हे कृषी प्रधान राज्य आहे. राज्यात कृषीपंपाचे क्षेत्र सर्वत्र व दुर्गम भागात पसरले आहे. कृषीपंपाकरीता वीज जोडण्यांच्या मागणीनुसार वीज पुरवठा करणे व त्याकरिता आवश्यक पायाभूत सुविधा उभारणे व सक्षमीकरण करून माफक दरात कृषी ग्राहकांना कृषीपंपाकरिता वीज पुरवठा उपलब्ध करणे, हे शासनाचे ध्येय आहे.

महाराष्ट्र राज्यात सुमारे ४५ लाख कृषी वीज ग्राहक आहेत. देशातील शेतीच्या विद्युत पंपांमध्ये महाराष्ट्राचा वाटा सर्वात मोठा आहे. राज्यामध्ये ऊर्जेच्या एकूण वापरापैकी कृषी क्षेत्रासाठी सुमारे २२% ऊर्जेचा वापर होत असून सदर वीजेचा वापर प्रामुख्याने कृषीपंपास वीज पुरवठा करण्यासाठी होतो. सध्या शेतकऱ्यांना चक्रीय पध्दतीने दिवसा व रात्री वीजपुरवठा केला जातो. अशाप्रकारे वीजपुरवठा होत असल्याने शेतकऱ्यांची खूप गैरसोय होते, रात्रीच्या वेळी शेतात सिंचन करताना वन्य प्राणी, साप चावणे, इत्यादी धोक्यांचा सामना करावा लागतो, या समस्या सोडविण्यासाठी दिवसा वीजपुरवठा करण्याची मागणी शेतकऱ्यांकडून सातत्याने होत असते. पारेषण विरहीत सौर पंप आस्थापित केल्यास या समस्येचे निराकरण करता येऊ शकते.

तसेच शासनाने शेतकऱ्यांना दिवसा वीज पुरवठा करण्यासाठी कृषी वाहिनीचे विलगीकरण आणि त्याचे सौर उर्जीकरण करण्याचा कार्यक्रम हाती घेतला आहे. त्याअंतर्गत वीज उपकेंद्राजवळ आवश्यक क्षमतेचे सौर प्रकल्प उभारुन त्याजवळील कृषी पंपांना दिवसा विश्वासार्ह आणि दर्जेदार वीजपुरवठा उपलब्ध होणार आहे. त्यामुळे पारंपारिक कृषी पंप दिवसा सौरऊर्जेवर चालण्यास मदत होईल.

यानुषंगाने शेतकऱ्यांना दिवसा विश्वासार्ह व अखंडीत वीज पुरवठा करण्यासाठी ५ वर्षाच्या कालावधीत ५ लक्ष पारेषण विरहीत सौर कृषीपंप आस्थापित करणे व पारंपारिक कृषीपंप वीज जोडण्या वितरित करणे तसेच कृषी वाहिनीचे सौर उर्जीकरणासाठी संलग्न योजना राबविण्याची व त्यासाठी आवश्यक असणारा निधी उपलब्ध होण्यासाठी AIIB बँकेकडून कर्ज घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

पारेषण विरहीत सौर कृषीपंप वितरित करण्याबाबत तसेच कृषी वाहिनीचे सौर उर्जीकरणासाठी संलग्न योजना राबविण्यासाठी व AIIB बँकेकडून कर्ज घेण्यास खालीलप्रमाणे शासन मान्यता देण्यात येत आहे:-

१. सदर योजनेच्या घटक अ-पारेषण विरहीत सौर कृषीपंपाचे वितरण ५ वर्षाच्या कालावधीत ५ लक्ष महावितरण कंपनीद्वारे करण्यास आणि घटक आ - कृषी वितरण प्रणालीचे बळकटीकरण आणि क्षमता वाढ करणे व कृषी वितरण प्रणालीचे सौर ऊर्जीकरण महावितरण कंपनीद्वारे करण्यास तसेच पहिल्या घटकासाठी रु. १३,४९३.५६ कोटी व दुसऱ्या घटकासाठी रु.१५४५.२५ कोटी असा एकूण रू. १५,०३९ कोटी इतक्या प्रकल्प खर्चास मान्यता देण्यात येत आहे.

२. या योजनेसाठी आवश्यक असणाऱ्या एकूण रकमेपैकी सुमारे ६० टक्के नुसार येणारी रक्कम रु. ९०२० कोटी इतका निधी "Market Borrowing" द्वारे Asian Infrastructure Investment Bank (AIIB) यांच्याकडून प्रचलित बाजारभावाच्या व्याजदराने राज्य शासनाने कर्ज घेऊन महावितरण कंपनीस देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. प्रकरणाधीन PPR ला शासनाने तत्वत: मान्यता दिल्यानंतर वित्त विभागाने तो केंद्र शासनाच्या मान्यतेसाठी दि.०६.१०.२०२३ रोजी पाठविला असता केंद्र शासनाच्या स्क्रिनिंग कमिटीने त्यांच्या दि.३०.०१.२०२४ रोजी संपन्न झालेल्या १४५ व्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार सविस्तर प्रकल्प अहवालास मान्यता देण्यात येत आहे.

४. सदर योजनेअंतर्गत रु. ४८१७.९७ कोटी एवढा निधी सन २०२४-२०२८ या वर्षात राज्य शासनाच्या अर्थसंकल्पिय नियतव्ययातून अनुदान स्वरुपात महावितरण कंपनीस देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

५. सदर योजनेकरीता एशिया इन्फ्रास्ट्रक्चर इन्व्हेस्टमेंट बँक (AIIB) कडून राज्य शासनाने घेतलेल्या कर्जाची व्याजासह परतफेड सन २०२९ ते सन २०४३ या कालावधीत करण्यासाठी अतिरिक्त वीज विक्री कराद्वारे जमा होणाऱ्या निधीतून व हरित ऊर्जा निधीतून (अर्थसंकल्पित तरतूद करून) करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

६. सदर योजना राबविण्यास व त्यासाठी आवश्यक कार्यपध्दती ऊर्जा विभागाद्वारे शासन मान्यतेने स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येईल.

**२.** योजनेची उद्दिष्टे खालीलप्रमाणे राहील-

१) ५ वर्षांच्या कालावधीत एकूण ५.० लाख सौर कृषीपंप आस्थापित करणे.

२) काही व्यवहार्य ठिकाणी सौरऊर्जेवर चालणाऱ्या मायक्रोग्रिडचे दिशादर्शक प्रकल्प राबविणे.

३) फिडर आणि पॉवर ट्रान्सफॉर्मर या दोन्ही स्तरांवर क्षमता वाढवणे आणि शासनाच्या कृषी वाहिनीचे सौर उर्जीकरण कार्यक्रमांतर्गत येणाऱ्या सौरऊर्जेला सामावून घेण्यासाठी राज्यभरातील निवडलेल्या उपकेंद्रातील वितरण प्रणालीचे सक्षमीकरण करण्याकरीता ब्रेकर्स, स्विचगियर व संरक्षण प्रणाली, कॅपेसिटर बँक, इ. बदलणे.

४) कृषीपंप ग्राहकांना दिवसा विश्वासार्ह व दर्जेदार वीजपुरवठा करणे.

५) कृषीपंपाकरीता लागणाऱ्या वीजेची पूर्तता अपारंपारिक स्त्रोताद्वारे (सौर ऊर्जा) निर्माण होणाऱ्या वीजेद्वारे करणे.

६) सद्यस्थितीतील विद्युत पायाभूत सुविधांचे बळकटीकरण व आवश्यक विद्युत वाहिनींचा विस्तार आणि एरियल बंच केबलचा वापर करून वीज वाहिनीवरील आकडे टाकून वीज चोरी करण्यावर प्रतिबंध करणे.

७) ) शेतकऱ्यांच्या कृषीपंपाचे वीज दर कमी करणे आणि औद्योगिक आणि व्यावसायिक ग्राहकांवरील क्रॉस सबसिडीचा भार कमी करणे.

**३.** योजनेत अंतर्भूत कामे खालीलप्रमाणे राहतील-

या योजनेतंर्गत खालीलप्रमाणे कामे करण्यात येणार आहेत-

१) संपूर्ण राज्यात पारेषण विरहीत सौर कृषीपंप प्रणालींचा पुरवठा, आस्थापना आणि देखभाल करणे. (५ वर्षांच्या कालावधीसाठी) या प्रणालींमध्ये स्वयंचलित मीटर रिडिंगद्वारे (AMR) थेट महावितरण कंपनीद्वारा संचालित केंद्रीय सर्व्हरवर डेटा ट्रान्सफर करण्याची तरतूद असेल.

२) सौर-उर्जेवर चालणारे मायक्रोग्रिडस विकेंद्रित पद्धतीने काही व्यवहार्य ठिकाणी व ज्याचा खर्च संबंधित शेतकरी उचलण्यास तयार होतील, अशा ठिकाणी उभारणे.

३) वितरण प्रणालीचे बळकटीकरण आणि क्षमता वाढः- राज्य सरकारच्या कृषी वाहिनीचे सौर उर्जीकरण कार्यक्रमांतर्गत येणाऱ्या सौरऊर्जेला सामावून घेण्यासाठी फीडर/ब्रेकर/ट्रान्सफॉर्मरची क्षमता वाढवणे आणि स्विचगियर व संरक्षण प्रणाली बदलणे तसेच राज्यभरातील निवडलेल्या सबस्टेशनवर वाढीव क्षमतेचे कॅपेसिटर बँक बसविणे. नवीन कृषीपंप विद्युत जोडणी देणे आणि आवश्यकता भासल्यास सद्यस्थितीतील विद्युत पायाभूत सुविधांचे बळकटीकरण करणे आणि आवश्यक विद्युत वहिनींचा विस्तार करणे.

४) वितरण प्रणालीचे प्रभावी संचालन व देखभालीसाठी महावितरण आणि शेतकऱ्यांना तांत्रिक सहाय्य उपलब्ध करुन देणे आणि त्यासाठी संबंधितांच्या क्षमता निर्माणाची (Capacity Building) तरतूद करणे.

**४.** सदर योजना महावितरण कंपनीद्वारे राज्यातील त्यांच्या अधिकार क्षेत्रात राबविण्यात येईल.

**५.** योजनेचे घटक खालीलप्रमाणे आहेत

अ. पारेषण विरहीत सौर कृषीपंपाचे वितरण ५ वर्षाच्या कालावधीत ५ लक्ष.

आ. कृषी वितरण प्रणालीचे बळकटीकरण आणि क्षमता वाढ करणे व कृषी वितरण प्रणालीचे सौर ऊर्जीकरण करणे.

या योजनेअंतर्गत पहिल्या घटकासाठी रु. १३,४९३.५६ कोटी व दुसऱ्या घटकासाठी रु.१५४५.२४ कोटी असा एकूण रू. १५,०३९ कोटी इतका खर्च अपेक्षित आहे.

**याबाबतचा तपशील खालीलप्रमाणे:-**

**(रु. कोटीत)**

| अ.क्र | AIIB कडून बाह्य सहाय्य (६०%) | राज्य शासन अनुदान अनुक्रमे (३०%) व (४०%) | शेतकऱ्यांचा लाभार्थी हिस्सा (सर्वसाधारण लाभार्थी१०% व अनु. जाती/जमाती लाभार्थी ५%) | एकूण |
|---|---|---|---|---|
| घटक अ | ८०९६.१३ | ४१९९.८७ | ११९७.५५ | १३४९३.५५ |
| घटक आ | ९२७.१५ | ६१८.१ | - | १५४५.२५ |
| एकूण | ९०२३.२८ | ४८१७.९७ | ११९७.५५ | १५०३९ |

६. प्रकल्पाच्या निधी उपलब्धते विषयीची वर्षनिहाय तपशिल :-

**(रु. कोटीत)**

| वर्ष | १ | २ | ३ | ४ | ५ | एकूण | एकूण युएस मिलीयन डॉलर मध्ये रु.८२ प्रति डॉलर दराने. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| शासनाकडून महावितरण कंपनीला अनुदान स्वरूपात अपेक्षित असलेला निधी (रु. कोटीत) | ४८१.७९७ | ९६३.५९४ | ९६३.५९४ | ९६३.५९४ | १४४५.३९१ | ४८१७.९७ | ५८७.५६ |
| AIIB कडून प्राप्त होणारे कर्ज (रु. कोटीत) | ९०२ | १८०४ | १८०४ | १८०४ | २७०६ | ९०२० | ११०० |
| लाभार्थीचा हिस्सा (रु. कोटीत) | ११९.७५५ | २३९.५१ | २३९.५१ | २३९.५१ | ३५९. २६५ | ११९७.५५ | १४६.०४ |
| एकूण(रु. कोटीत) | १५०३. ९ | ३००७.८ | ३००७.८ | ३००७.८ | ४५११.७ | १५०३९ | १८३४ |

७. सदर योजनेतंर्गत पारेषण विरहीत सौर कृषीपंपाचे वितरण ५ वर्षाच्या कालावधीत ५ लक्ष व कृषी वितरण प्रणालीचे बळकटीकरण आणि क्षमता वाढ करणे व कृषी वितरण प्रणालीचे सौर ऊर्जीकरण करणे यासाठी राज्य शासनाच्या अर्थसंकल्पिय नियतव्ययातून अनुदान स्वरुपात एकुण रु. ४८१७.९७ कोटी देण्यात येतील.

८. एशिया इन्फ्रास्ट्रक्चर इन्व्हेस्टमेंट बँक (AIIB) कडून घेतलेल्या कर्जाची परतफेड दिनांक ३० जून २०२९ पासून दिनांक ३० डिसेंबर २०४३ पर्यंत तीस समान हप्त्यामध्ये करावयाची आहे.

एकूण कर्ज व व्याज तसेच परतफेड याबाबतचा तपशील खालीलप्रमाणे आहे-

| **विवरण** | **रक्कम (रु. मिलियन युएस डॉलर)** | **रक्कम (रु. कोटी)** | |
|---|---|---|---|
| | | **युएस डॉलर- रुपये किंमत चढ उतार वगळता** | **युएस डॉलर-रुपये किंमत चढ उतारग्राहय धरुन** |
| कर्जाची मूळ रक्कम | १०८७ | ९०२० | १३०७४ |
| व्याजाची रक्कम | ७३१ | ६०७१ | ७७६६ |
| वचनबध्दता शुल्क | ५ | ४५ | ४८ |
| एकूण | १८२३ | १५१३६ | २०८८८ |

(टिप-चलनाचे अवमूल्यन दर, २० वर्षांच्या CAGR प्रमाणे २.९१ टक्के दरसाल ग्राहय धरले आहे.)

९. या योजनेकरिता घेतलेल्या कर्जाची व्याजासह परतफेडीसाठी सन २०२९ ते २०४३ या कालावधीत एकूण रु. १५१३६ कोटी (डॉलर-रुपये किंमत चढ उतार वगळून) /रु. २०८८८ कोटींची (डॉलर-रुपये किंमत चढ उतार ग्राह्य धरून) आवश्यकता आहे. त्यानुसार दरवर्षी सुमारे रु. १४०० कोटीची आवश्यकता आहे. या योजनेसाठी एशिया इन्फ्रास्ट्रक्चर इन्व्हेस्टमेंट बँक (AIIB) कडून राज्य शासनाने घेतलेल्या कर्जाची व्याजासह परतफेड करण्यासाठी निधीचा स्त्रोत खालीलप्रमाणे राहील-

१. **अतिरिक्त वीज विक्रीकर**

शासनाने दिनांक १५ नोव्हेंबर, २०१८ च्या शासन निर्णयान्वये पूर्णत: राज्य शासनाची मुख्यमंत्री सौर कृषीपंप योजना सुरू केली होती. सदर योजनेसाठी लागणाऱ्या निधीचा स्त्रोत अतिरिक्त वीज विक्री करात १० पैशांनी वाढ करुन करण्यात आला. सदरच्या वाढीव दराची आकारणी दिनांक ०१ जानेवारी, २०१९ पासून राज्यातील शहरी व ग्रामीण भागातील वीज ग्राहकांकडून करण्यात येत आहे. सदरची रक्कम महावितरण कंपनीकडील एस्क्रो खात्यात परस्पर जमा होत आहे. सदर वाढीव अतिरिक्त वीज विक्री कराची वसूली अद्यापि चालू असून त्यातून जमा होणाऱ्या निधीचा वापर एशिया इन्फ्रास्ट्रक्चर इन्व्हेस्टमेंट बँक (AIIB) कडून राज्य शासनाने घेतलेल्या कर्जाची व्याजासह परतफेड करण्यासाठी करण्यात येईल.

२. **हरित ऊर्जा निधी**

राज्यात अपारंपारिक ऊर्जेचा प्रचार, प्रसार व प्रसिध्दी तसेच अपारंपारिक ऊर्जा निर्माण करण्याकरिता व वापर वाढविण्याकरिता सन २००४ पासून हरित ऊर्जा निधीची स्थापना करण्यात आली आहे. यासाठी औद्योगिक व व्यावसायिक वीज ग्राहकांकडून सद्यस्थितीत ८ पैसे प्रति युनिट या दराने हरित कर आकारण्यात येत आहे. सदर निधीत जमा होणाऱ्या रक्कमेतून काही रक्कम एशिया इन्फ्रास्ट्रक्चर इन्व्हेस्टमेंट बँक (AIIB) कडून राज्य शासनाने घेतलेल्या कर्जाची व्याजासह परतफेड करण्यासाठी वापरण्यात येईल.

**१०.** सदर योजनेचा आराखडा हा.रु. १० कोटींपेक्षा जास्त होत असल्याने महावितरण कंपनी सदर योजनेचा सविस्तर प्रकल्प अहवाल मा. महाराष्ट्र विद्युत नियामक आयोगाकडे मंजुरीकरीता सादर करेल व त्यावर आयोगाची तत्वत: मंजुरी घेईल.

**११.** योजनेची अंमलबजावणी खालीलप्रमाणे करण्यात येईल:-

१) सदर योजनेची अंमलबजावणी महावितरण कंपनीद्वारे करण्यात येईल.

२) सदर योजनेची अंमलबजावणी महावितरण कंपनी शासकीय विहित पध्दतीने करेल.

३) प्रकल्पातील विविध टप्प्याच्या समन्वयासाठी इतर प्रतिनिधी/एजंट कडून प्रकल्प व्यवस्थापन सेवा वापरण्यात येतील.

४) संस्थात्मक विकास, क्षमता निर्माण आणि जागरुकता अश्या उपक्रमांसाठी खाजगी सल्लागाराची नेमणूक महावितरण कंपनीद्वारे केली जाईल.

५) प्रकल्प राबविताना काही आंशिक/किरकोळ बदल उद्भवल्यास महावितरण कंपनीच्या अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक यांच्या सल्ल्यानुसार सदर कक्षाद्वारे त्याबाबत कार्यवाही करण्यात येईल.

६) योजनेतील घटक अ- पारेषण विरहीत सौर कृषीपंपाचे वितरण करण्यासाठी दि. १२ मे, २०२१ च्या शासन निर्णयातील कुसूम योजना घटक ब मधील अटी/शर्ती/तरतूदीप्रमाणे राहतील. तसेच योजनेतील घटक आ कृषी वितरण प्रणालीचे बळकटीकरण आणि क्षमता वाढ करणे व कृषी वितरणप्रणालीचे सौर ऊर्जीकरण करण्यासाठी मुख्यमंत्री सौर कृषी वाहिनी योजना २.० या योजनेच्या आवश्यकतेप्रमाणे राहणार तसेच योजनेतील घटक आ कृषी वितरण प्रणालीचे बळकटीकरण आणि क्षमता वाढ करणे व कृषी वितरण प्रणालीचे सौर ऊर्जीकरण करण्यासाठी मुख्यमंत्री सौर कृषी वाहिनी योजना २.० या योजनेच्या दि.०८.०५.२०२३ च्या शासन निर्णयातील अटी व शर्ती प्रमाणे राहतील.

७) या योजनेच्या अंमलबजावणी करीता सविस्तर मार्गदर्शक सूचना /कार्यपध्दती शासन मान्यतेने निर्गमित करण्यात येईल.

**१२.** योजनेच्या अटी व शर्ती खालीलप्रमाणे राहतील.

**१.** केंद्र शासनाच्या स्क्रिनिंग कमिटीने त्यांच्या दि.३०.०१.२०२४ रोजी संपन्न झालेल्या १४५ व्या बैठकीत प्रकल्पास मान्यता देताना उपस्थित केलेल्या मुद्द्यांची पूर्तता करणे, महावितरण कंपनीस बंधनकारक राहील.

**२.** या योजनेकरीता घेतलेल्या कर्जाची परतफेड अतिरीक्त वीज विक्रीकर व हरीत ऊर्जा निधीतून करण्यात येणार आहे. एशिया इन्फ्रास्ट्रक्चर इन्व्हेस्टमेंट बैंक (AIIB) कडून मिळणारे कर्ज हे प्रतिपूर्ती स्वरुपातील असल्याने या कामासाठी उपलब्ध करुन दिलेल्या नियतव्यय वेळेवर खर्च करण्याची दक्षता महावितरण कंपनीची राहील.

**३.** महावितरण कंपनीकडून उभारण्यात येणाऱ्या कर्जाची व व्याजाची परतफेड विहीत वेळेत करण्यात यावी व राज्य शासनाला कर्ज व व्याजाची परतफेड, कमिटमेंट चार्जेस अथवा अन्य कोणतेही चार्जेस यांचा आर्थिक भार सोसावा लागणार नाही, याची दक्षता महावितरण कंपनीकडून घेण्यात येईल.

**४.** AIIB बँकेकडून घेण्यात येणाऱ्या कर्जाची परतफेड महावितरण कंपनीमार्फत होण्यासाठी महावितरण कंपनी व राज्य शासन यांच्यात करारनामा करण्यात येईल.

**१३.** “पारेषण विरहीत सौर कृषी पंप व पारंपारिक पंप वीज जोडण्या वितरित करण्याबाबत तसेच कृषी वाहिनीचे सौर उर्जीकरणासाठी संलग्न योजना AIIB बँकेकडून कर्ज घेऊन राबविण्यासाठीची योजना” हा प्रकल्प/ योजना राबविल्यामुळे शाश्वत विकास ध्येय क्रमांक ७ चे लक्ष्य क्र. ७.१ व ७.२ सन २०३० पर्यंत साध्य करण्यास उपयुक्त ठरणार आहे.

**१४.** सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक- १११/का-१४६१, दि. ०७.०३.२०२४ व वित्त विभागाच्या सहमतीने तसेच मा. मंत्रिमंडळाच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

**१५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२४०३१५१४५४२४०५१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NARAYAN SHRIKRISHNA KARAD

Digitally signed by NARAYAN SHRIKRISHNA KARAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=fc35aa8ffade5bb6105200693c60a32b755f7e67f72965b8dd57adaa570981f1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AE7FAEABAF4571C2748E4DD5FFD2CD108DE0E130859970F4D7D0EE40046B3E9E, cn=NARAYAN SHRIKRISHNA KARAD
Date: 2024.03.15 15:04:29 +05'30'

**( ना.श्री.कराड )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई,
२) मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) मा.उपमुख्यमंत्री (ऊर्जा) महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
५) सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मुंबई,
६) विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधान परिषद, विधान भवन मुंबई,
७) सर्व विधानमंडळ सदस्य,विधान भवन, मुंबई,
८) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
९) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०) अपर मुख्य सचिव (ऊर्जा),उद्योग,ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२) सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव यांचे स्वीय सहायक,सर्व मंत्रालयीन विभाग,
१३) सर्व विभागीय आयुक्त,
१४) सर्व जिल्हाधिकारी,
१५) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई-१/२,
१६) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, नागपूर-१/२,
१७) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१८) सचिव, महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग, मुंबई (पत्राने),
१९) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ, सूत्रधार कंपनी मर्या.,मुंबई,
२०) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्या.,मुंबई,
२१) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी मर्या.,मुंबई,

२२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी मर्या.,मुंबई,

२३) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सोलार ॲग्रो पॉवर कंपनी,मुंबई

२४) महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा),पुणे,

२५) ऊर्जा उप विभागातील सर्व कार्यासने, उद्योग,ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई.

२६) निवड नस्ती,ऊर्जा-७, उद्योग,ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई.